योजना माहिती प्रणाली (MP-SIMS) चा परिणामकारक वापर करण्याकरिता आवश्यक बाबींच्या नोंदी करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण २०१५/प्र.क्र.२८/ का.१४११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई -४०० ०३२
दिनांक- १८ मे, २०१५.

## परिपत्रक

योजना माहिती प्रणाली (MP-SIMS) वर कामकाज करताना सर्व प्रशासकीय विभागांनी (विकासक्षेत्रांनी) अपेक्षित सर्व बाबींच्या नोंदी योग्य वेळी करणे अनिवार्य आहे.

२. मा. राज्यपाल महोदयांना व मा. मुख्यमंत्री महोदयांना योजना माहिती प्रणाली (MP-SIMS) वरील दरमहा खर्चाची विवरणपत्रे सादर करण्यात येतात. मा. मुख्य सचिव महोदयांना MP-SIMS व वित्त विभागाच्या BEAMS या दोन्ही प्रणालींच्या सहाय्याने विभागांनी भरलेल्या माहितीच्या आधारे खर्चाची माहिती विहीत विवरणपत्रात उपलब्ध करुन दिली जाते. सदर प्रणालीवर नियमित माहिती भरण्यासंदर्भात वेळोवेळी सूचना देऊनही अपेक्षित कार्यवाही झालेली दिसून येत नाही.

३. आकडेवारीमध्ये येणाऱ्या तफावतीची मुख्य कारणे खालीलप्रमाणे आहेत:-

अ) MP-SIMS प्रणालीवर दर महिन्याच्या अखेरीस भरावयाची मासिक खर्चाची आकडेवारी नियमित भरली जात नाही.

ब) Cross Reference Code (CRC Code) यांची द्विरुक्ती होते.

क) प्रशासकीय विभागांमार्फत योजनांचे Scheme Profile माहिती प्रणालीवर भरताना योजनांचे अद्यावत शासन निर्णय अपलोड (Upload) करण्यात येत नाहीत.

४. सदर अडचणी त्वरित दुर करणे आवश्यक झाले आहे. यास्तव सर्व विभागांनी आपल्या विभागातील अर्थसंकल्प शाखेशी संबंधीत सह सचिव/उप सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यांची नेमणूक करुन दिनांक ३०.०५.२०१५ पर्यंत उपरोक्त नमूद बाबींवर आवश्यक कार्यवाही करण्याबाबत त्यांना सूचना देण्यात याव्यात. सदरची कार्यवाही करताना कांही अडचण असल्यास सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, (संगणित्र शाखा), ४ था मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय समोर, मुंबई-३२ येथे प्रत्यक्ष संपर्क साधावा.

५. यापुढे सन २०१५-१६ करिता प्रशासकीय विभागांचे योजनेसंबंधी निधी वितरणाचे प्रस्ताव तपासताना त्या योजनेचा/योजनेचे मूळ शासन निर्णय व तद्नंतरचे सर्व सुधारित शासन निर्णय योजनेच्या Scheme Profile मध्ये MP-SIMS प्रणालीवर Upload करुन उपलब्ध केलेले नसल्यास अशा प्राप्त प्रस्तावांच्या निधी वितरणास नियोजन विभागाची मान्यता देण्यात येणार नाही, याची सर्व संबंधित विभागांनी नोंद घ्यावी.

सदरचे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०५१८१५०८४३८६१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Kashinath Gambre

Digitally signed by Sanjay Kashinath Gambre
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Kashinath Gambre
Date: 2015.05.18 18:10:01 +05'30'

**( सं. का. गंब्रे )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:**

१) सर्व विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
३) मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
४) मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव
५) अपर मुख्य सचिव (वित्त), प्रधान सचिव (व्यय), सचिव (वित्तीय सुधारणा) व सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६) प्रधान सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
७) नियोजन विभागातील सर्व विकासक्षेत्र कार्यासनांचे सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी
८) सह सचिव/उप सचिव (वित्त विभाग), अर्थसंकल्प शाखा
९) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, ८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१०) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११) सहसंचालक अर्थ व सांख्यिकी संचालनालय, (संगणित्र शाखा), ४ था मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय समोर, मुंबई-३२.
१२) नियोजन विभागातील सर्व विकासक्षेत्र कार्यासने
१३) निवडनस्ती-का.१४११, नियोजन विभाग.